**वित्तीय मान्यता-**
**सन २०१७-१८ मध्ये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) मृद आरोग्य पत्रिका (SHC) योजनेचा सन २०१६-१७ मधील अखर्चित निधी वितरीत करण्याबाबत. (सर्वसाधारण प्रवर्ग)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मृदस १४१६/ प्र.क्र.१४४ / १७ अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २२ जून, २०१७.

**वाचा :-**

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत मृद आरोग्य पत्रिका योजनेच्या मार्गदर्शक सुचना
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १६-२/२०१५/, फर्ट युज (i) दि.३० मार्च, २०१७ चे तीन पत्र.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०१७ /प्र.क्र.७५ / अर्थ - ३, दि. १८ एप्रिल,२०१७.
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. १४-१/२०१५ फर्ट युज (अे), दि. १८.०४.२०१७

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत मृद आरोग्य पत्रिका योजनेची सुरूवात केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासून सुरु केलेली आहे. सन २०१५-१६ पासून ही योजना केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के प्रमाणात राबविण्यात येत आहे. यामध्ये राज्यातील सर्व शेतक-यांना मृद आरोग्य पत्रिकेचे वितरण करण्यात येणार आहे. मृद आरोग्य पत्रिकेच्या माध्यमातून त्यांच्या शेत जमिनीचा रासायनिक गुणधर्म स्थिती,प्रमुख अन्नद्रव्यांची पातळी व सूक्ष्म मुलद्रव्ये कमतरता स्थितीची माहिती मृद आरोग्य पत्रिकेतील अहवालानुसार शेतक-यांना पिकनिहाय खत मात्रांची शिफारस देण्यात येत आहे.

केंद्र शासनाने सन २०१६-१७ मध्ये दुस-या हप्त्यापोटी रू. ६९५.६६५ लाख इतकी रक्कम वितरीत केली होती. सदरहू रक्कम उशीरा प्राप्त झाल्याने ती कृषी आयुक्तालयास वितरीत करता आली नाही. आता केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र. ४ येथील पत्रान्वये सदर निधी सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्याकरिता पुर्नजिवित करून दिलेला आहे. आता, केंद्र शासनाकडून प्राप्त प्रवर्गनिहाय निधीपैकी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिस्सा रू. ५२८.४६५ व त्या प्रमाणात राज्य हिस्सा रू. ३५२.३१ लाख मिळून एकूण रू. ८८०.७७५ लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) मृद आरोग्य पत्रिका योजनेसाठी सन २०१६-१७ मध्ये दुस-या हप्त्यापोटी प्राप्त रू. ६९५.६६५ लाख निधी सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाने मान्यता दिल्याने यापैकी सर्वसाधारण प्रवर्गाकरिताचा केंद्र हिस्सा रू. ५२८.४६५ लाख ( रूपये पाच कोटी अठ्ठावीस

लाख सेहेचाळीस हजार पाचशे फक्त ) आणि राज्य हिस्सा रू. ३५२.३१ लाख ( रूपये तीन कोटी बावन्न लाख, एकतीस हजार फक्त ) असे एकूण रू. ८८०.७७५ लाख ( रूपये आठ कोटी ऐंशी लाख सत्त्याहत्तर हजार पाचशे फक्त )  निधी वितरीस करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा ( ६० % ) | राज्य हिस्सा ( ४० % ) | एकूण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण | ५२८.४६ लाख | ३५२.३१ लाख | ८८०.७७ लाख |

**२.** या प्रित्यर्थ होणार खर्च चालू सन २०१७-१८ या करीता मंजुर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. डी-३**
२४०२, मृद व जलसंधारण.
(००) १०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
( ००) (१६) कृषी उन्नती योजना-मृदा आरोग्य पत्रिका ( केंद्र पुरस्कृत योजना )
( केंद्र हिस्सा ६० %) ( २४०२ अे०४१ ) ( सर्वसाधारण ) योजनांतर्गत
३३ - अर्थसहाय्य.

**मागणी क्र. डी-३**
२४०२, मृद व जलसंधारण.
(००) १०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
( ००) (१७) कृषी उन्नती योजना-मृदा आरोग्य पत्रिका ( केंद्र पुरस्कृत योजना )
( राज्य हिस्सा ४० %) ( २४०२ अे०५९ ) ( सर्वसाधारण ) योजनांतर्गत
३३ - अर्थसहाय्य.

**३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या पत्रात नमुद केलेल्या अटी व शर्तीनुसार राबविण्यात यावी. तसेच केंद्र शासनाने त्यांच्या निधी वितरणाच्या पत्रात घटकनिहाय मंजूर केलेल्या निधीस अनुसरून राबविण्यात यावी.

२) मृद आरोग्य पत्रिका योजनेतील ( ६०:४०) मार्गदर्शक सूचनामध्ये दिलेल्या खर्चाच्या निकषाप्रमाणे विविध घटकांना वित्तीय सहाय्य देण्यात यावेत.

३) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखापरिक्षण केलेला अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावा. तसेच अंमलबजावणी

करणा-या यंत्रणेने सविस्तर भौतिक व आर्थिक लक्षांक व साध्य यांचा अहवाल वेळोवेळी केंद्र शासनास सादर करावा. तसेच प्रवर्गनिहाय सुध्दा खर्चाचे लेखे व्यवस्थित ठेवण्यात यावेत.

४) योजनेशी संबंधित लेखे प्रधान लेखाधिकारी व कॅग यांच्या अंतर्गत लेखापरिक्षणाकरिता खुले असावेत. तसेच, त्यांनी वेळोवेळी मागणी केलेले कागदपत्रे त्यांना सादर करण्यात यावेत.

५) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमाखर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमुद करण्यात यावे जेणेकरून पारदर्शी स्वरूपात सदर रकमा विचारात घेता येतील व संदीग्धता राहणार नाही.

६) कोणत्याही परिस्थितीत मंजुर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही, या बाबत कृषी संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

४. कृषि संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य-पुणे हे योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणुन काम पाहतील व सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे /वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

**५.** सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र ९/१४३१, दि. २९.०५.२०१७ व ९७/२०१७ व्यय-१, दि. १६.०६.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२२१४५९३९०९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2017.06.22 14:56:55 +05'30'

**( प्रकाश. रा. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) रा.मंत्री ( कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) प्रधान सचिव (कृषी ) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त ( कृषी ),महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) सर्व संचालक , कृषी आयुक्तालय, पुणे.
७) सर्व सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१३) नियोजन विभाग-१४३१
१४) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवडनस्ती.